# श्री कोळेश्वराची आरती नं. १

जय एकाक्षर रूपाभेदत्रय होसी । रजतम सात्विक रूपें स्वरूपीं आलासी ।।

चतुरानन हरिहर या धरिलें नामासि । सृजसि पालिसि स्थिरचर अंती संहरसि ।।

जय जय जय कोळेश्वर त्रिगुणात्मक देवा । सुरमुनि गण गंधर्वहि करिती तव सेवा ।। जय ।। १ ।।

जिव शिव परमात्माहि त्रिपुटी मावळली । देह ध्यातां ध्यानें उन्मनि स्थिर झाली ।

साधुमुनि जन त्यातें निजमुक्ति कळली । निशिदिनीं हरिगुरूध्यातां भवमाया सरली ।। जय ।। २ ।।

त्रिगुणात्मक होऊनियांत्रिभुवन चालविसी । भार्गव रूपें भार्गव स्वरुपी झालासी ।

कोळथरें या ग्रामी ज्योतिर्लिंग वससी । विश्वंभर विश्वात्मज ध्यातो भजनासि ।। जय ।। ३ ।।

## आरती नं. २

कल्मषभारे मानव बहुतचि कष्टले । धर्मा टाकुनिया पाखंडी बनले ।

निर्गुणपरमेशातें विसरूनियां गेले । त्यांसि उद्धाराया शंकर अवतरले ।

जय देव जय देव जय मुनि सुख धामा । आरती ओवाळूं सज्जन विश्रामा ।। १ ।।

क्षेत्री नांगरितां या पुण्यग्रामीं । लाधलि मूर्ति किराता पोखरितां भूमि ।

प्रगटे जग ताराया त्रिजगाचा स्वामी । नगरजनीं रचियेलें मंदिर बहु नामी ।। २ ।।

कोळथरें या ग्रामीं सज्जन जे वसति । त्यांचे सभ्दाग्य मी वर्णावें कीति ।

त्रिपुरहरातें प्रतिदिनी दर्शन पावति । भोगुनि सौख्या अंतीं कवळिति ते मुक्ति ।। जय ।। ३ ।।

मूर्तिशिळेची रूचिरा नेत्रा सुख देते । मस्तकीं श्रीगंगा नित्य अवतरते ।

सिंहनिनादे प्रतिदिनीं देवालय घुमतें । साक्षात्कार देखुनि भजनीं मन रमतें ।। जय ।। ४ ।।

ब्रह्मा विष्णु महेश त्रिगुणात्मक मूर्ति । करितां पूजन भावें मन कामना पुरती ।

स्वकृपाछत्राखालीं भक्तांच्या पंक्ति । आपत्तापासुनि रक्षिसि या जगतीं ।। जय ।। ५ ।।

सुयश दिगन्तरिं पसरे कोळेश्वर यांचें । शिव शिव हर हरनरवर घोष करिती वाचे ।

टाळ्या पिटोनि प्रेमें थय् थय् जन नाचे । मूर्ति स्वयंभू देखूनि भक्ति मनी सांचें ।। जय ।। ६ ।।

भस्म विभूषित तनु जो व्याघ्रांबरधारी । फणिवरमंडित हर तो ध्यावा त्रिपुरारि ।

करता पूजन भावें जो भवभय हारी । तल्लिनतत्पदिं झाला नारायणभारी ।। जय ।। ७ ।।